**सिंचन विषयक चौकशी समितीच्या अहवालातील सुधारणा क्र. ७ च्या अंमलबजावणीची कार्यपध्दती निश्चित करण्याबाबतच्या शिफारशी**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१५/ (प्र.क्र. ४१९ /२०१५)/सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०००३२,
दिनांक: १७/०४/२०१७

**वाचा :-** १) शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र.संकीर्ण २०१४/(२४८/१४)/मोप्र-२,दि.२५/८/१४
२) शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र.संकीर्ण २०१४/(३७१/१४)/मोप्र-२,दि.३/११/१४
३) मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग,कोकणप्रदेश, यांचे जा. क्र. /मु.अ/तां- ४ / जसंविकोप्र / ६८०, दि. ०९/०३/२०१७
४) मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, अमरावती यांचे पत्र क्र.जा.क्र.५८५२/सिंव्य-१/ २०१६, दि. १९/११/२०१६
५) मुख्य अभियंता (जसं) जलसंपदा विभाग, औरंगाबाद यांचे जा.क्र.तांशा-१ (सिंचन)/ धा-०७/६००७/सो.प्र, दि. २४/११/२०१६

**प्रस्तावना :-**

सिंचन विषयक विशेष चौकशीच्या अहवालातील ४२ सुधारणांच्या अंमलबजावणीचे संनियंत्रण करण्यासाठी संदर्भिय १ च्या शासन आदेशानुसार वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या पातळीवर समिती स्थापन करण्यात आली आहे. या समितीची दुसरी बैठक दि. २०/१०/२०१४ रोजी झाली. या बैठकीमध्ये सिंचन विषयक विशेष चौकशीच्या अहवालातील प्रस्तावित सुधारणा क्र. ७ नुसार **कोकण,अमरावती व मराठवाडा प्रदेशातील प्रकल्पांचा सखोल अभ्यास करुन पाणीवापर कमी असण्याच्या कारणांचा शोध घेऊन त्यानुसार वितरण यंत्रणेत सुधारणा करणे, लाभक्षेत्र विकासाची कामे करणे, प्रकल्पांचे आधुनिकीकरण करणे यासारख्या आवश्यक त्या उपाययोजना केल्यास पाण्याचा वापर वाढून सिंचित क्षेत्रात वाढ होईल अशी चर्चा झाली.** त्यानुषंगाने कोकण, अमरावती व मराठवाडा प्रदेशातील मुख्य अभियंता यांच्या अध्यक्षतेखाली प्रत्येक प्रादेशिक विभागनिहाय उपसमित्या संदर्भिय २ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आली होती. या उपसमितींकडून अनुक्रमे कोकण विभागातील तिलारी, राजनाला व देवगड प्रकल्प, अमरावती विभागातील अप्पर वर्धा व अडाण तसेच मराठवाडा प्रदेशातील ऊर्ध्व पेनगंग़ा करपरा प्रकल्प यांचा सखोल अभ्यास करुन सिंचनवाढी विषयी करावयाच्या कार्यवाहीबाबत शिफारशी अहवाल संदर्भ क्र. ३,४ व ५ अन्वये शासनास सादर केला आहे. कोकण, अमरावती व मराठवाडयातील सिंचन प्रकल्पांचा पाण्याचा वापर व सिंचित क्षेत्रात वाढ होण्याकरिता या उपाययोजना करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

**अ) सर्वसाधारण उपाययोजना -**

राज्यातील सर्व पाटबंधारे प्रकल्पांच्या अनुषंगाने पाणी वापर कार्यक्षमता वाढविण्याच्या दृष्टीकोनातून खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१. शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिंव्य (कामे) दि. १७/११/२०१६ अन्वये सिंचन व्यवस्थापनाची कामे महामंडळाकडे वर्ग करण्यात आलेली असून पाणीपट्टीची रक्कम दुरुस्तीच्या कामासाठी खर्च करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. पाणीपट्टी वसुलीमध्ये वाढ करुन प्रकल्पाच्या देखभाल दुरुस्तीची कामे महामंडळ स्तरावरुन तत्परतेने करावीत.

२. प्रतीवर्षी धरणात उपलब्ध होणाऱ्या पाण्याबाबतचे नियोजन हे उपलब्ध पाणीसाठा, पाऊसपाणी, हवामान, बिगरसिंचन पाणी वापर विचारात घेऊन कृषी विभागाच्या संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांच्या सल्ल्याने व कालवा सल्लागार समितीच्या बैठकीत सविस्तर चर्चा करुन ठरवावे.

३. बिगरसिंचन घरगुती पाणी वापराची नेमकी गरज लक्षात घेऊन जिल्हाधिकारी यांच्यामार्फत जलाशयामध्ये पाणी आरक्षण करणे अपेक्षित आहे. मात्र जिल्हाधिकारी यांच्यामार्फत प्रासंगिक पाणी आरक्षण करताना लोकसंख्या व पाणी वापराच्या मापदंडावर आधारित नेमकी गरज परिगणीत न करता मोठ्या प्रमाणात पाणी राखीव ठेवण्याबाबत निर्देश दिले जातात, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. या संदर्भात शासन निर्णय क्र. संकीर्ण-२००३/(३१०/०३)/सिं.व्य.(धो), दि.१०.०४.२००४ अन्वये सविस्तर सूचना देण्यात आल्या आहेत. या शासन निर्णयातील तरतूदींनुसार मापदंडाचा व लोकसंख्येचा विचार करुन पाण्याची नेमकी गरज काटेकोरपणे परिगणीत करुन जिल्हाधिकारी यांनी प्रासंगिक आरक्षणाबाबत निर्देश देण्यात यावे. तसेच या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ४.० मधील तरतूदीनुसार ग्रामपंचायत, शहराची नगरपालिका, महानगरपालिका किंवा महाराष्ट्र जीवन प्राधिकरण या संस्थासाठी पाटबंधारे प्रकल्पातील जलाशयात पिण्याच्या पाण्यासाठी प्रासंगिक आरक्षणाची मागणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी जलसंपदा विभागाकडे प्रचलित जल दरानुसार पाणीपट्टीची ५०% रक्कम आगाऊ भरावी. संबंधित संस्थेने जलसंपदा विभागाकडे ५०% आगाऊ रक्कम १५ दिवसात न भरल्यास पाणी आरक्षण आपोआपच रद्द होईल.

४. लाभधारकांमध्ये शेती व पाण्याच्या वापराविषयी जागृती करण्यात यावी. तसेच महाराष्ट्र सिंचन व्यवस्थापन कायदा २००५ अंतर्गत १००% लाभक्षेत्रावर पाणी वापर संस्था स्थापन करुन लाभधारकांच्या सहभागातून सिंचन व्यवस्थापन करावे.

५. पाणी वापर संस्था सक्षमीकरणासाठी अधिकारी व लाभार्थ्यांसाठी वेळोवेळी प्रशिक्षणवर्ग आयोजित करुन लाभधारकांना मार्गदर्शन करावे.

६. लाभधारकांकरीता प्रोत्साहनपर योजना राबवाव्यात.

७. MWRRA Act २००५ मधील तरतुदीनुसार टेल टु हेड यापद्धतीने सिंचन करावे.

८. प्रकल्प लाभक्षेत्रात सूक्ष्म सिंचन पद्धती राबविण्यासाठी लाभधारकांना प्रोत्साहित करण्यात यावे. त्या करिता कृषि विभागाचे सहाय्य घ्यावे.

९. मुख्य कालवे व वितरण कालव्याद्वारे ज्या ठिकाणी शेवटपर्यंत म्हणजे शेतापर्यंत पाणी पोहोचत नाही त्याठिकाणी आवश्यक दुरुस्तीची कामे तातडीने हाती घ्यावीत.

१०.शेतापर्यंत पाणी जाण्यासाठी आवश्यक उर्वरित लाभक्षेत्र विकासाची कामे शासनाच्या प्रचलित मार्गदर्शक सूचनांनुसार पूर्ण करावेत.

**ब) कोकण, अमरावती व मराठवाडा विभागातील पाणी वापर वाढविण्यासाठी विभागनिहाय उपाययोजना -**

**I. कोकण विभाग -**

१) कोंकण प्रदेशांतर्गत बहुतांश ठिकाणी जांभा भूस्तर असल्यामुळे पाण्याचा पाझर जास्त असलेल्या कालव्यांना निवडक अस्तरीकरण करावे.
२) कोंकणात शेतक-यांचे भूधारण क्षेत्र कमी असल्याने सामूहिक शेती पध्दती करण्याबाबत कृषी विभागाच्या सल्ल्याने विचार करावा.
३) दापोली कृषी विद्यापीठाने प्रस्तुत केलेली लाखबाग योजना सर्व शेतकरी / लाभार्थी पर्यंत पोहोचविण्यात यावी.
४) कोंकण प्रदेशामध्ये बारमाही पिकांचे क्षेत्र वाढविण्याच्या दृष्टीने कृषी विभागाच्या सहकार्याने मोहीम हाती घ्यावी.

**II. अमरावती विभाग व औरंगाबाद विभाग -**

१) मुख्य कालवे व वितरण प्रणालीची व लाभक्षेत्र विकासाची अपूर्ण कामे त्वरीत पूर्ण करावीत.
२) या प्रदेशामध्ये सक्षम सिंचन व्यवस्थापन यंत्रणा अस्तित्वात नसल्याने या प्रदेशांमध्ये सिंचन संस्कृती विकसित झालेली नाही. या प्रदेशामध्ये अधिकारी व लाभार्थ्यांसाठी विस्तृत व वारंवार प्रशिक्षण वर्ग आयोजित करुन सिंचन व्यवस्थापनाचे नियम, कायदे व पध्दती याबाबत जागृती करावी.
३) खरीप, रब्बी व उन्हाळी हंगामात पाण्याच्या उपलब्धतेनुसार पिकांचे नियोजन करण्याबाबत कृषि विभागाच्या सहकार्याने प्रयत्न करावेत.
४) खरीप हंगामामधील पाणी वापर वाढविण्यासाठी विशेष प्रयत्न करावेत.

**क) नाविन्यपूर्ण उपाय योजना -**

१) कालव्यातील वहनव्यय व पाणीनाश कमी करण्यासाठी बंदिस्त नलिकेचा वापर करावा.
२) सामूहिक शेतीपध्दतीचा वापर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०४१७१५५६४०६६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.04.17 16:05:25 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत :-**

१) स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) स्वीय सहायक, प्रधान सचिव, कृषी व पणन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) स्वीय सहायक, प्रधान सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) स्वीय सहायक, सचिव(वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) स्वीय सहायक, प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी. टी. हॉस्पीटल ईमारत, ७ वा मजला, व्ही. टी, मुंबई.
९) स्वीय सहायक, सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, ७ वा मजला, मर्झबान पथ, मुंबई.
१०) स्वीय सहायक, सचिव(जलसंधारण),जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) स्वीय सहायक, सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) कृषी आयुक्त, पुणे.
१३) महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
१४) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१५) कार्यकारी संचालक, गोदावरी व मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
१६) कार्यकारी संचालक, कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे.
१७) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१८) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१९) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) मुख्य अभियंता, कोकण प्रदेश , मुंबई.
२१) विभागीय कृषी सह संचालक (कोकण), ठाणे.
२२) अधीक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, कुवारभव, रत्नागिरी.
२३) जिल्हा कृषी अधिक्षक, सिंधुदुर्ग.
२४) कार्यकारी अभियंता, तिलारी कालवा विभाग क्र. १, सावंतवाडी.
२५) मुख्य अभियंता(जसं), अमरावती.
२६) विभागीय कृषी सहसंचालक, अमरावती.
२७) अधीक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा प्रकल्प मंडळ, अमरावती.
२८) जिल्हा कृषी अधिक्षक, अमरावती.
२९) कार्यकारी अभियंता, उर्ध्व वर्धा कालवा विभाग क्र.३, धामनगाव.
३०) मुख्य अभियंता (जसं), औरंगाबाद
३१) विभागीय कृषी सह संचालक, औरंगाबाद.
३२) अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड
३३) अधीक्षक अभियंता, व प्रशासक लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद
३४) जिल्हा कृषी अधिक्षक , औरंगाबाद.
३५) कार्यकारी अभियंता, उर्ध्व पैनगंगा प्रकल्प विभाग क्रं. १, नांदेड.
३६) कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग क्र. २, परभणी.
३७) सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३८) सर्व अवर सचिव , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३९) सिं.व्य.(कामे) संग्रहार्थ.